वितरण आदेश क्र.१२

"सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेचा निधी वितरीत करण्याबाबत"

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.५८/शिक्षण-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४

**संदर्भ :-** (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
(२) इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०३.०५.२०२३, दिनांक १९.०६.२०२३, दिनांक १८.०७.२०२३,दिनांक २६.०७.२०२३, दिनांक १८.०९.२०२३, दिनांक ५.१०.२०२३, दिनांक २०.११.२०२३, दिनांक ०६.०२.२०२४, दिनांक १५.०३.२०२४, दिनांक १८.०३.२०२४ आणि दिनांक ३०.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५E९५५)) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेली रु. ५.०० कोटी ची तरतूद वितरीत केली असून ती पूर्णपणे खर्च झालेली आहे.

२. सदर लेखाशिर्षाखाली अधिक निधीची आवश्यकता असल्याने या लेखाशिर्षाकरिता विजाभज च्या विद्यार्थ्यांसाठी दिवंगत वसंतराव नाईक गुणवत्ता बक्षीस योजना(कार्यक्रम)(लेखाशिर्ष २२२५F०२२) अंतर्गत अखर्चित राहणारा रु.७०.०० लाख निधी तसेच इमाव प्रवर्गातील गुणवंत विद्यार्थ्यांसाठी दिवंगत वसंतराव नाईक गुणवत्ता बक्षिस योजना(कार्यक्रम) (२२२५एफ२३६) अंतर्गत अखर्चित राहणारा रु.७०.०० लाख निधी असा एकूण रु.१.४० कोटी निधी वित्त विभागाकडून पुनर्विनियोजनाने प्राप्त झाला आहे वित्त विभागाकडून पुनर्विनियोजनाने इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५E९५५)) या लेखाशिर्षाकरिता उपलब्ध झालेला रु.१.४० कोटी निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५E९५५)) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेली रु. ५.०० कोटी ची तरतूद वितरीत केली असून ती पूर्णपणे खर्च झालेली आहे.

२. सदर लेखाशिर्षाकरिता अधिक निधीची आवश्यकता असल्याने वित्त विभागाने पुढीलप्रमाणे पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन दिलेला आहे.

**(रु.कोटीत)**

| **अ. क्र.** | **योजनेचे नाव व लेखाशिर्ष** | **सुधारित अंदाज** | **पुनर्विनियोजनाची रक्कम** | **पुनर्विनियोजना नंतरची रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | **३** | **४** | **५** |
| १ | विजाभज च्या विद्यार्थ्यांसाठी दिवंगत वसंतराव नाईक गुणवत्ता बक्षीस योजना (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५F०२२) | **०.७०** | **(-)०.७०** | **००** |
| २ | इमाव प्रवर्गातील गुणवंत विद्यार्थ्यांसाठी दिवंगत वसंतराव नाईक गुणवत्ता बक्षिस योजना(कार्यक्रम) (२२२५एफ२३६) | **०.७०** | **(-)०.७०** | **००** |
| ३ | इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५E९५५) | **५.००** | **(+)१.४०** | **६.४०** |

इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (लेखाशिर्ष २२२५E९५५)) या लेखाशिर्षाकरिता उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे उपलब्ध झालेला रु.१.४० कोटी निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातून खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त

विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०४०२१२५३०१८३३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARATI DINESH DHURI

Digitally signed by BHARATI DINESH DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6B3C122EDC26AC3532130D69CD06C9664E8A139B9A532752E240A4851A8C9D3C, cn=BHARATI DINESH DHURI
Date: 2024.04.02 13:02:15 +05'30'

**(भारती दि. धुरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
९. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती (शिक्षण-१)